१९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ च्या प्रकरणी मा .न्यायालयाने दिलेल्या आदेशान्वये वाढीव मोबदल्यांच्या न्यायालयीन प्रकरणात उच्च न्यायालयात प्रतिभूती ठेवी जमा करणेबाबत.

**(८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी)**

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग ( मदत व पुनर्वसन ).
शासन निर्णय क्रमांक आव्यप्र-२०१९/प्र.क्र.६६/आव्यप्र-२.
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २०२०

**संदर्भ** - १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन) क्रमांक:आव्यप्र-२०१६/प्र.क्र.३६/आव्यप्र-२, दि.२७ एप्रिल,२०१६

२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक: न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२,दि.०३ जून,२०१५.

३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे आदेश

१. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.४४, दि. १९.१०.२०१९,
२. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२२, दि. १९.०९.२०१९,
३. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२३, दि. १९.०९.२०१९,
४. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२४, दि. २४.०९.२०१९,
५. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२५, दि. २६.०९.२०१९,
६. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२६, दि. २६.०९.२०१९,
७. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२७, दि. २६.०९.२०१९,
८. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२८, दि. ०७.१०.२०१९,
९. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१२९, दि. २३.१०.२०१९,
१०. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१३०, दि. ३०.१०.२०१९,
११. जा.क्र.२०१९/ पुनर्वसन / न्या.प्र. / प्र.क्र.१३३, दि. १३.११.२०१९,
रोजी निर्गमित केलेले आदेश.

**प्रस्तावना :**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या उस्मानाबाद जिल्हयातील भूकंपग्रस्त गावांचे नवीन गावठाण पुनर्वसनासाठी शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना ठरवून दिलेली जमिनीची रक्कम जिल्हा सत्र न्यायालय व मा.दिवाणी न्यायालय यांनी विविध भूसंदर्भामध्ये वाढीव मोबदला दिलेला असल्याने विविध प्रकरणात शासनाने मा.उच्च न्यायालयात अपील्स दाखल केली आहेत. यावर मा.उच्च न्यायालयाने वेगवेगळया आदेशांद्वारे न्यायालयात ठेव स्वरुपात निधी जमा करण्याचे आदेश दिलेले आहेत. अशा प्रकरणात उस्मानाबाद जिल्ह्यातील संपादीत करण्यात आलेल्या जमिनींचा, भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ खाली सुधारीत परिगणनेनुसार,वाढीव मोबदला म्हणून रक्कम मा.न्यायालयात ठेव स्वरुपात जमा करण्यासाठी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन १९९३ मध्ये आलेल्या भूकंपामुळे बाधित झालेल्या उस्मानाबाद जिल्ह्यातील भूकंपग्रस्त गावांचे पुनर्वसनाकरिता शासनाने संपादित केलेल्या जमिनीच्या भूधारकांना भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ च्या प्रकरणी प्रकरणी दिवाणी न्यायालयाने दिलेल्या दिलेल्या निर्णया विरूध्द मा. उच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या प्रथम अपील प्रकरणांत संबंधित भूधारकांना मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दिलेल्या (Conditional Order) आदेशान्वये वाढीव मोबदला म्हणून खालील तक्त्याप्रमाणे एकूण रक्कम **रु. १५,०१,५६,१५९/- (रुपये पंधरा कोटी एक लक्ष छप्पन्न हजार एकशे एकोणसाठ फक्त)** इतकी रक्कम मा. उच्च न्यायालयात प्रतिभूती ठेव म्हणून जमा करण्यासाठी या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे:-

मुख्य लेखाशिर्ष ८६७४ या लेखाशिर्षामधून अदा करावयाचा वाढीव मोबदला

| अ. क्र. | भूधारकाचे नाव | संपादित केलेल्या गावाचे नाव | एल.ए. आर. क्र. | रक्कम |
|---|---|---|---|---|
| | जिल्हाधिकारी, उस्मानाबाद | | | |
| १ | श्री. गणपती दौला सरपाते. | मो. सांगवी (जेवरी), ता. निलंगा, जि. लातूर | ३/२००१ | २०,२८,८२२/- |
| | जिल्हाधिकारी, लातूर | | | |
| २ | श्री. देविदास शंकर आणि इतर | मौ.जेवळी , ता. लोहारा, जि. उस्मानाबाद | १६५,१६७,१६८/०८ | ९,७३,९६०/- |
| ३ | श्री. माणिक हणमंत पवार व इतर | मौ.काळनिंबाळा , ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | ११६३,११६४,११६५/०९ | १८,५१,८१४/- |
| ४ | श्री. शिवाजी ल. पवार व इतर | मौ.नाईकुचार , ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | १९६,१९१,१९२,१९४,१९५,१९८/२०१० | ६,०२,८९,१२९/- |
| ५ | श्रीम. हाफीजाबी पठाण व इतर | मौ.जेवळी , ता. लोहारा, जि. उस्मानाबाद | ५३४,५३५,५४२,४५४/२००५ | ४३,४०,२५१/- |
| ६ | श्रीम. पुतळाबाई व इतर | मौ.जेवळी , ता. लोहारा, जि. उस्मानाबाद | ५३६/२००५ | ४६,९६,१२७/- |
| ७ | श्री. गोरोबा वाघमारे व इतर | मौ.माकणी , ता. लोहारा, जि. उस्मानाबाद | ७२६,७०७,७३७,७४०,७४१/०९,२१३/१२ | १,८९,९५,४८१ |
| ८ | श्री. संगप्पा महादप्पा झांबरे व इतर | मो. कवठा, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | ३, ४, ५/२०१० | ७५,७१,४८६/- |
| ९ | श्री. तानाजी केरनाथ मुंगळे व इतर | रा.नारंगवाडी, ता.उमरगा, जि.उस्मानाबाद | २४७,२५६,२६७,२६९,२७०, २७१,२७२,२७५, ३४५/२०१३व २८१/२०११ | ३,९३,७५,१७१/- |
| १० | श्री. किसन शिवराम माने व इतर | रा. पेठसावंगी, ता. उमरगा, जि. उस्मानाबाद | ११३५, ११३६/२००९ | २९,६२,८०२/- |
| ११ | श्री. साधु बळीराम लाळे. | मो. एकोंडी, ता लोहारा, जि.उस्मानाबाद | २७३/२०१३ | ७०,७१,११६/- |
| एकूण | ( रुपये पंधरा कोटी एक लक्ष छप्पन्न हजार एकशे एकोणसाठ फक्त ) | | | १५,०१,५६,१५९/- |

२. याबाबतीत होणारा खर्च हा "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा (संगणक संकेतांक ८६७४ ००१९)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. वर उल्लेखित लेखाशीर्षाखाली देण्यात आलेली मंजुरी ही अंतरीम आहे. जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा अंतिम निकाल शासनाच्या बाजूने लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयातून काढून त्या रकमेचा भरणा "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रकमा" या लेखाशीर्षाखाली करावा लागेल.

४. जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द लागला तर सदरहू रक्कम "मागणी क्र. सी -६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०६, भुकंप, १०१, अनुग्रह सहाय्य, (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्च, (९२)(०१) भूकंपग्रस्तांसाठी सहाय्य (२२४५ २४८१) ३१, सहाय्यक अनुदाने" या लेखाशीर्षाखाली जमा दर्शवून खर्च या अंतिम लेखाशीर्षाखाली टाकावा लागेल व त्या परिस्थितीत संबंधित जिल्हाधिकारी आवश्यक रकमेच्या मंजुरीबाबतचा रीतसर प्रस्ताव शासनास सादर करतील व अर्थसंकल्पीय तरतूद करवून घेतील.

५. संबंधीत जिल्हाधिकारी यांनी वरिष्ठ न्यायालयातील अपिलाचा निकाल लागल्याबरोबर या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी. कोणत्याही खातेदारास कोणत्याही प्रकरणी दुहेरी फायदा/प्रदान मिळणार नाही याची दक्षता जिल्हाधिकाऱ्यांनी घ्यावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास पाठवावा.

६. **ज्या प्रकरणी मा.उच्च न्यायालयात अनामत रक्कम भरण्याचे मा.उच्च न्यायालयाचे विवक्षित आदेश नाहीत, अशा प्रकरणी "८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" या शिर्षाखाली निधी उपलब्ध करता येणार नाही, याची दक्षता घ्यावी.**

७. विभागीय आयुक्त कार्यालय व त्यांच्या अधिपतयाखालील जिल्हाधिकारी कार्यालयाकडुन सादर होणारी वाढीव मोबदल्याची प्रकरणे ही अनेक त्रुटी व अपु-या माहितीची तरोच मा. उच्च न्यायालयाच्या निकालानंतर ब-याच कालावधीने शासनास प्राप्त होत असल्याचे निर्दशनास येत आहे व तसे त्यांना वारंवार कळविण्यात आलेले आहे. यासंदर्भात मा. उच्च न्यायालयाने (औरंगाबाद खंडपिठ) कोणत्याही प्रकरणात दंडात्मक आदेश दिल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी विभागीय आयुक्त कार्यलय व जिल्हाधिकारी यांची राहणार आहे.

८. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाने शासन निर्णय क्र.न्याकभ-१०.०६/प्र.क्र.४६/अर्थ संकल्प-२,दिनांक २९.०७.२००६ अन्वये महसूल व वन विभागास प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन तसेच वित्त विभाग परिपत्रक क्रमांक:न्याखभ-२०१५/प्र.क्र.१३१/अर्थ-२, दि.०३.०६.२०१५ अन्वये लेखाशिर्ष "८६७४-शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी" या लेखाशीर्षाखाली भूसंपादन अधिनियम,१८९४ मधील कलम १८ खालील वाढीव मोबदला उपलब्ध करुन देणेबाबत प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारास अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

९. दि.१५.०२.२००३ रोजी मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने प्रथम अपील क्र.११२३/२००२ मधील सिव्हील अर्ज क्र.७९६०/२००२ मध्ये सूचित केल्याप्रमाणे नियुक्त करण्यात आलेल्या उच्चस्तरीय चौकशी समितीचे धोरण/ निर्णय या प्रकरणी लागू राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 202008241611437419 असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सं. प्र. मळेकर)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
जिल्हाधिकारी, उस्मानाबाद
भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, उमरगा,जि. उस्मानाबाद
कोषागार अधिकारी, उस्मानाबाद
महालेखापाल १/२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी २ प्रती)
वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/व्यय-१/अर्थोपाय कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
मा.मंत्री (भु.पु.) यांचे खाजगी सचिव यांना माहितीस्तव सादर.
अवरसचिव/ कार्यासन अधिकारी (ब-१/म-३/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय,
निवड नस्ती, आव्यप्र-२.